

# प्रकाशकाचे शब्दं

महर्षी व्यास लिखीत महाभारतामध्ये अनेक व्यक्तीरेखा आहेत. पण ज्या व्यक्तीरेखेला बहुपेडी अस्तित्व आहे अशा श्री कृष्णाला महाभारतातच काय पण जगातल्या कोणत्याच महाकाव्यात तोड नाही. नटखट बाल नंदलाल, गोपिकांची छेड काढणारा कन्हैय्या, दुष्ट कंस आणि कालिया ह्यांना संपवणारा चक्रधर, द्रौपदीचा बंधू हरी, बासरीच्या सुरांनी प्राणीमात्रांनाही वेड लावणारा मुरारी, करी शस्त्र न घेता पांडवांची जीत घडवून आणणारा माधव, सुदाम्याचा मित्र केशव, द्वारकेचा शासक वासुदेवनंदन आणि संभवामि युगे युगे अशी आश्वासक ग्वाही देणारा भगवदगीतेचा उदगाता महानायक श्रीकृष्ण. जणू अनेक व्यक्तीच.

या प्रत्येक रुपात पुन्हा बहुपेडी, बहु आयामी. भगवदगीतेतून कोणी कर्म योग घेईल, कोणी ज्ञान योग तर कोणी भक्तीयोग. कौरव पांडवांच्या युद्धातून कोणाला कृष्णाची धोरणी छबी भावेल, तर कोणाला त्याचे मित्रप्रेम तर कोणाला अधर्माशी दोन हात करणारा यदुनंदन. गोवर्धन गिरिधारी श्रीकृष्णात कोणी त्राता पहातं तर मीरेसारख्या असंख्य जोगिणी त्यात सखा पहातात. श्रीकृष्णावर आजवर असंख्य काव्य रचली गेली. किंबहुना इतर कोणावर नसतील इतकी सुंदर आणि रसाळ गीतं गोविंदाच्या स्फुर्तीने लिहीली गेली. आजही कान्ह्याइतका संगीत आणि काव्याला स्फुरण देणारा देव कोण असेल?

कृष्ण...तो जे काही होता ते इतरांसाठी. जगासाठी जरी तो देव असला तरी राधेसाठी मात्र ‘तिचा’ प्रिय सखा होता, जिवलग होता आणि तिचा स्वतःचा असा खास देवही होताच की . सूर्यदेवावर रागवून ब्रम्हाची नवसृष्टी निर्माण करणारी राधा प्रसंगी ह्या चक्रधारीसही आव्हान देत असे. पण तिचे भावविश्व त्याच्या अवती भवती गुंफ़लेले होते.‘तिच्या’ कृष्णाचे भावविश्व, प्रेमविश्व खुप तरल, सुकोमल होते. त्यालाच शब्दंरुप देण्याचा एक उत्कट प्रयत्न म्हणजे कवयित्री स्वप्नाच्या ह्या कविता. राधा,कृष्ण आणि बासरी असा हा त्रिवेणी संगम आहे. मानवी पातळीवर एका प्रेमिकेच्या तिच्या जिवलगासाठी लिहिलेल्या ह्या कविता.

आज गोकुळाष्टमीच्या शुभ मुहूर्तावर कुसुमाग्रज प्रतिष्ठान ‘साहित्यभूषण’ पुरस्कार विजेती कवयित्री स्वप्ना कोल्हे ह्यांच्या श्रीकृष्ण आणि राधा ह्यांच्यातील भावविश्वाच्या उत्कट कवितांचा संग्रह ‘कृष्णा’ प्रसिद्ध करताना आम्हाला अतिशय आनंद होत आहे.प्रेम विरुध्द व्यसन ह्या जीवघेण्या लढाईवर आधारित कवितांचे त्यांचे पहिले ई बुक ‘तो,मी आणि सिगरेट’ला लाभलेल्या प्रचंड प्रतिसादानंतर त्यांचे हे दूसरे ई बुक आम्ही प्रकाशित करत आहोत.

ह्या कविता आणि हे ई पुस्तक आपणांस कसे वाटले ते नक्की कळवा.

**नाम गुम जायेगा**

**समन्वयक ई साहित्य प्रतिष्ठान**

**(९८६९६७४८२०)**

# कृष्णा

राधा मी,सखी मी,प्राप्ती मी मोक्षाची
राधा मी,भक्ती मी,शक्ती मी कृष्णाची

चंद्रमुखी मी,पौर्णिमा,चकोर चकित सुनैना मी
अमृते मुखकमल धुवूनी दशदिशा उजळिते मी
राधा मी..

दामिनी मी,चपला,चक्रधारीस आव्हान मी
रागे भरता दिनकरावर,ब्रम्हाची नवसृष्टी मी
राधा मी..



रासेश्वरी मी,सुंदरा,रसिक शिरोमणीची रती मी
उत्कट,निर्मल,आत्मिक प्रेमाची व्याख्या मी
राधा मी..

वियोगिनी मी,विरहा,पुरुषोत्तमाची पूजक मी
दिली बन्सी मुरलीधराने जिस ती भाग्यश्री मी
राधा मी..

प्रिया मी,अमरा,जगन्नाथ तो वैश्विक,अणू मी
देहोत्सर्गी कृष्ण ह्रदयी विराजित एकमेव ‘कृष्णा’ मी

राधा मी,सखी मी,प्राप्ती मी मोक्षाची
राधा मी,भक्ती मी,शक्ती मी कृष्णाची

# बासरी

शिकव ना शिकव ना
मला तू बासरी
श्रीहरी
शिकव ना शिकव ना
जादूगरी
श्रीहरी



सांग कशी खेचू स्वर अस्मानी गाभ्यातला
नाचवू कशा सांग पाकळ्या ह्या बोटांच्या
मारु कशी फुंकर मी ब्रम्हांडी
बोलेल कशी ही वेणू अबोलशी
शिकव ना शिकव ना

जमेल का मज सूर श्वासात भरणे
वाहतील ना मग,निनाद अचूकसे
येईल का मंद्र सप्तकात भिजणे
जमेल का तीव्र मध्यमात उतरणे
पोहेल कशी ही पक्षीण सप्तडोही
शिकव ना शिकव ना

अडेल जरी गीत माझ्या अधरी
जमेल ना जमेल सूत बासरीशी
जाण तू,तुझी रे प्रिया मी बावरी
घेऊनी अन मग तान तू सुरेलशी
गुंजेल कशी ही धून जीवनी
शिकव ना शिकव ना

# सप्तडोहांचा महाल

फाल्गुनातल्या मध्यराती तू साद दिलीस
अन मी धावले,पानगळ तुडवत
टिपूर चांदण्यांचा पदर सावरत
पूर्ण चंद्राचा पहारा झेलत
तुझ्यासाठी

सैरभैर मनाने,बेचैन पावलांनी
झोकून दिलं स्वतःला
तुझ्या सप्त डोहांच्या महालात
उष्ण कायेला पडला वेढा,निळ्याहिरव्या लाटांचा
पण ना श्वास गुदमरले,ना नाका तोंडात गेली गढुळता
चंद्रप्रकाशात तरंगत होती,एक भाववेडी



नाचऱ्या बोटांनी तू रेखली
सप्तडोहांवर लाटांची नक्षी
तुझी,फुंकरीवर फुंकर अन
सप्तडोहांची दालनं थरथरली
उठले कापरे तरंग,अंर्तमनी
आसमंतात उघडली दिशांची कवाडं
अन कळलं
आपलं अनादि आदिम नातं

त्या फाल्गुनराती तरंगले मी,विदेह
काळाच्या सुईच्या रथात
निघाले डोहाबाहेर,तडफडत
काळ लोटला पण
सप्त डोहात पोहतंय
आजही,मासोळी होऊन,माझं मन आजही..

# बोल रे



हवीत मज उत्तरे
रे केशवा
तू ये आज,आज बोल,तू बोल रे
लपू नको सुरांमागे
शब्दांत हो व्यक्त रे
तू ये आज,आज बोल,तू बोल रे

का रे सुर अपुले असे हे मिसळले
ना जलतरंग ना सारंगी
ना मृदंग ना वीणा
का रे,का सांग तू प्राण माझ्यातच रे फुंकले
हवीत मज उत्तरे
तू ये आज,आज बोल,तू बोल रे

का रे बंध अपुले असे हे जन्मांतरीचे
ना राधा ना मीरा
ना रुक्मिणी ना भामा
का रे,का सांग तू प्राण माझ्यासवे रे सोडले
हवीत मज उत्तरे
तू ये आज,आज बोल,तू बोल रे

# मोजणी

येत्या जात्या श्वासांची
नको करु मोजणी रे मुरारी
बोले रे मुरली,रे मुरारी,बोले रे मुरली

अडकले कसे श्वास
न बोलवेल मजला
बरळले कसे भास
न सांगवेल मजला
बोलू कशी मी ?
थबकते तुझे श्वास
तुझे श्वास रे माझी वाणी
बोले रे मुरली,रे मुरारी,बोले रे मुरली



रुसवा मी धरते
तक्रारही करते
का रे करु मी गोपिंची विनवणी
वाटू कशी मी
अमोलसे तुझे श्वास
तुझे श्वास रे माझी वाणी
बोले रे मुरली,रे मुरारी,बोले रे मुरली

जाती विदेशी रे विहंगमाला
तुटती अखेरी रे श्वासांच्या माळा
वेचू कशी मी विखुरते तुझे श्वास
तुझे श्वास रे माझी वाणी
बोले रे मुरली,रे मुरारी,बोले रे मुरली

# मन्मंदिर



दूर नसे मी तुला कधी
दुरावा नसे कधी उरी
बघ सये तू मन्मंदिरी
हासे,बोले नीत श्रीहरी

निशा कसली नि प्रभात केव्हा
तू दिशा नि तूच रस्ता
येते जेव्हा समीप सये
बासरीत माझ्या सूर तेव्हा

साद कोणती नि हाक केव्हा
तू आवाज नि तूच भाषा
घेते जेव्हा श्वास मंदसे
बासरीत माझ्या प्राण तेव्हा

स्वर्ग कुठला नि धरती केव्हा
तू आसरा नि तूच निवारा
गाते जेव्हा गीत अबोलसे
बासरीत माझ्या जीव तेव्हा

अधर काय नि ओंजळ केव्हा
तू तन नि तूच आत्मा
होते जेव्हा मीलन अपुले
बासरीत माझ्या सृजन तेव्हा

# छल

मोहना रे मोहना
तू तर चतुरच रे ऐसा
क्षणात रडविशी
क्षणात हसविशी
मधुर बोलांनी मला भुलविशी

निसटू पहाता मजवर जाल फेकशी
हाय ! करी छल रे कैसा,मोहना

जाणरे रे,जाणते
पावरीत जीव तुझा रमतो
मानते रे मानते
गोपींची मस्करी तू करतो
का रे का सांग पण मज
संशय हा छळतो ?



ओवतांना गजरा फुल रे निखळते
सयांसवे रे ना मन माझे रमते
कातर समयी दाटून येते
होते कसकस,नींद ना येते

मन अजूनही माझे रास झुल्यावर झुलते
तुलाही कधी का रे याद माझी येते ?

आता नको पण मुरली ती छेडू
सावरु पाहे मन,नको आस लावू

विसरु पहाता अधिक आठवशी
हाय ! करी छल रे कैसा,मोहना

# कैफियत

बासरी धरते ओठी,नयनी येते पाणी
कशी सांगू मुरारी तुला माझी कहाणी ?

        श्वास माझे कधी कोसळती कड्यावरुनी
        शेवाळती कधी थंड डोहातूनी , कधी अडकती काट्यामधूनी
        रक्ताळती कधी तप्त मरुस्थानातूनी

जसजसे श्वास घेते , काळीज चर्र होते
कुण्या बैराग्याची मला साद येते
चुकतात ठोके , मी अंतराळी हरवते
कृष्णविवर जणु माझी भूक होते
राहते ना मी माझी कुणी और होते

        तडफडते,भटकते होऊनी मीरेची आर्त वाणी
        कशी सांगू मुरारी तुला माझी कहाणी ?
        बासरी धरते ओठी,नयनी येते पाणी



मन घट्ट करुनी,पुन्हा सूर मी पकडते
गाली उतरते ओघळ मंद हवा पुसत जाते
उदबत्तीच्या रेषेरेषेत रुप तुझे विहरते
तरंग सुंदर अविचल मन तरंगते

        क्षणभर रे क्षणभर,क्षणभर मी सुखात नाहते
        शांत डोहात लाट,आतून कल्लोळ उठते
        कालियाचे फणे बनूनी मज काही डसते

तळमळते विखुरते होऊनी विकल विराणी
कशी सांगू मुरारी तुला माझी कहाणी ?
बासरी धरते ओठी,नयनी येते पाणी

        मुके शब्दं माझे,मुके सूर गातात
        थांबणारे श्वास तुला रे तुलाच पुकारतात
न कुठे बासरी अन न कुठे रे मी उरते
तुझे रुप मिटल्या लोचनी उतरते
        श्वासांची माळ रे पुन्हा गुंफत येते
        पण दूर बासरी,दूर दूर सारे असते

कैफियत ही माझी म्हणू की बासरीची ?

# अवतार

हरखले मी हरखले,भानही हरपले
अचंभित मी,स्तंभित मी

ऐकूनी हरी वाणी
कृष्ण मुरारी बनवारी
अवतरेल राम अवतारी
हरखले मी हरखले,भानही हरपले

रसरसाळ बोल तुझे रे,असे पण मन चंचल
जमेल का रे,जमेल का तुज हे महाकठीण व्रत ?

फुटी तांबडे,यमुनेला येशी
फोडी घागर,वस्त्रं पळविशी
गोपांसवे माखन लुटशी
जमेल का रे,जमेल का अता ना करणे बरजोरी
वनी तरुतळी,ना छेडणे मुरली ?
कृष्ण मुरारी बनवारी अवतरेल राम अवतारी ?



अनाहताचे सूर घुमले,थरथरले पाणी
जमेल का रे,जमेल का तुज गाणे मूक गाणी

नको दुष्ट बोली,नको निर्वाण वाणी
मन रंगीत करतो,तन संगीत बनतो
पर असू दे ना हे सारे फक्त मजसाठी
जमेल का रे,जमेल का अता ना रंग उधळणे
जनी वृंदावनी,ना रास रचणे
कृष्ण मुरारी बनवारी अवतरेल राम अवतारी ?

कशास दूजे नाम स्मरणे,नको उध्दाराचे बहाणे
जमेल का रे,जमेल का तुज राधाकृष्ण होणे

कृष्ण मुरारी बनवारी अवतरेल राम अवतारी ?

# लाजरी



हावरी नसे रे
असे मी लाजरी
लाजरी साजरी
नसे मी हावरी

अधराशी तुझ्या
जुळता,उधळते स्वरराशी
उधळता उधळता
उरते ना कुणी मी माझी
कसे रे मग होणे देणे घेणे
येते मला दान देता रिक्त होणे
हावरी नसे रे असे मी लाजरी

तुटता संग तुझा
तुटते तुटते जिवानिशी
तमा कुणा ना
असते बासरी उपाशी
व्रत असे रे,कसले रुसवे फुगवे
येते मज मूकपणे प्रीत निभवणे
हावरी नसे रे असे मी लाजरी

# रंग

रंगले रे कान्हा
तुझिया रंगी रंगले रे
प्रेमरंगी तुझिया
कंच भिजले रे
उडविले असे
अबीर गुलाल रे
धवल गगनी
इंद्रधनु उमटले रे
रंगले रे



भिजविले असे
मोहनी पिचकारीने रे
भोळेसे तन
खुळेसे मन
मोरपंखी जाहले रे
रंगले रे

वाजविले असे
गीत मुरलीने रे
अंतरी माझिया
नादगंध विहरले रे
रंगले रे

अशी रंगले रे
कान्हा
मी तुझाच रंग ल्याले रे
रंगले रे कान्हा,रंगले रे



# कृष्णा

संकल्पना ,लेखन ,सजावट व मांडणी

स्वप्ना कोल्हे,नाशिक

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन।
मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोस्त्वकर्मणि।।

प्रकाशक आणि वितरक

साहित्य प्रतिष्ठान

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन दर्जेदार काव्य पुरविण्याचा ई साहित्य प्रतिष्ठानाचा ध्यास आहे.आम्ही आपल्यासाठी नवनवीन ई पुस्तके सातत्याने प्रकाशित करत असतो.आमच्या विनामुल्य ई पुस्तकांसाठी ताबडतोब नोंदणी करा.**esahity@gmail.com** ला फक्त एका शब्दाची ईमेल जरा.’नोंदणी करा’ अशी..बस्स.आणि ह्या वर्षातली ई बुक्सची सिरीज आपल्या ईमेल ईनबॉक्स मध्ये धडाधड येऊन पडेल बघा ! पहिला येईल त्याला पहिलं पुस्तक.ई बुक्स हे साहित्याचं भविष्य आहे.आपणही ह्या नवीन ई साहित्य महायज्ञात सामील व्हावं असा आमचा आपल्यास प्रेमळ आग्रह.इंग्रजी भाषेत ५ लाखाहून अधिक ई बुक्स आहेत.तर मराठीत शंभराच्या आसपास.हे चित्रं आपल्याला बदलायचंय.यासाठी आपण आमच्या सोबत या,संपर्क साधा.आमची नेटाक्षरी,बाल नेटाक्षरी,हास्य नेटाक्षरी साप्ताहिकं देखील प्रकाशित होत असतात.नेटाक्षरी ह्या साप्ताहिक अंकाने नुकताच शतकोत्सवी अंक प्रकाशित केला आहे.हा अंक सध्या सुमारे ९०,००० मराठी रसिकांना विनामुल्य वितरीत केला जातो.आणि,आमच्या संकेतस्थळाला भेट देऊन आमची ई बुक्स,ई अंक वाचणाऱ्यांची संख्या विलक्षण आहे.दर आठवड्याला आमची नवनवीन विषयाला वाहिलेली ई साप्ताहिकं येतातच.मराठी भाषेत एका वादळी झंझावाताने प्रवेश केलाय.ऑर्कुट वरील कम्युनिटीज काव्यांजली,मराठी कविता,मराठी कविताप्रेमी,कवितांचं घर इ.५०,००० हून अधिक सदस्य असणाऱ्या लोकप्रिय कम्युनिटीजच्या सदस्यांनी चालवलेलं हे जबरदस्त व्यासपीठ आपल्यास प्रेमाचं आमंत्रण देतं आहे.

ई साहित्य प्रतिष्ठानची नेटाक्षरी,हास्य नेटाक्षरी,दुर्ग दुर्गट भारी ही प्रकाशनं नियमितपणे सुरुच असतात.प्रत्येक मराठी ईमेलधारक,इंटरनेटला जोडलेला प्रत्येक मराठी माणूस आमच्या ह्या साहित्य चळवळीशी जोडला जावा हा आमचा ध्यास आहे.मराठी साहित्य नव्या ई युगात सर्वोच्च स्थानावर जावं,मराठी अभिव्यक्तीची ताकद जगभर पसरलेल्या नव्या पिढीला ठळकपणे जाणवावी हा आमचा प्रामाणिक उद्देश आहे.नवीन मराठी साहित्यिकांना व्यक्त होण्यासाठी हे नवीन व्यासपीठ उपलब्ध करुन देण्याचा आमचा हेतू आहे.तेव्हा संपर्कात रहा.आपल्या मित्र मैत्रिणींचे ईमेल आयडी आम्हांस पाठवा.आपले अभिप्राय कळवा.काही खटकले तर तेही लिहा.आवश्यक आहे हो.हा उपक्रम आपल्या सर्वांचा आहे.चार लोकांत चांगलं नाव झालं पाहिजे ना!आमचे ईबुक्स व ई अंकांना भरभरुन मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय.

हे ई बुक आपल्या फ्रेंडलिस्टला फॉरवर्ड करतांना तुम्ही आमच्याही ईमेल आयडीचा समावेश केल्यास आम्ही आपले आभारी राहू.मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपलाही हातभार लागावा हीच सदिच्छा.जगभर विखुरलेल्या मराठी माणसांना शब्दांनी जोडायचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला दृढ विश्वास आहे.कळावे,लोभ असावा ही विनंती.

आपला मित्र..

नाम गुम जायेगा

समन्वयक ई साहित्य प्रतिष्ठान (9869674820)

## *आमची इतर ई प्रकाशने –*

विनोदाचा दादा-ई स्टॉप,कवितांचा आवाज-स्वर नेटाक्षरी,मुलांचा नेट प्रवेश-बाल नेटाक्षरी,महाराष्ट्राचं वैभव-दुर्ग दुर्गट भारी

## *आमची प्रकाशित ई पुस्तके –*

*टल्लीची शाळा,मकरंदच्या त्रिवेण्या,ग्रेव्हयार्ड लिटरेचर,चार क्षण,तो आणि ती,प्रियेचे अभंग,देशी दारुचे दुकान,ई शाळा, तो मी आणि सिगरेट,मोरया,लोकल गोष्टी,मीरा(मराठी अनुवाद),ओथंब,सावळया मुलीची गाणी,सईची वही,लालनाक्या, एक होते राजे,ओथंब २*

वरील ई पुस्तके मोफत मिळण्यासाठी,सूचना,अभिप्राय,प्रतिक्रिया,स्वलिखित साहित्य पाठवण्यासाठी – www.esahity.com

*नेटाक्षरी हा विनामुल्य अंक नियमित मिळण्यासाठी,सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी* - netaksharee@gmail.com

*ई साहित्यची सर्व प्रकाशने* cd *मध्ये देखील उपलब्ध आहेत संपर्क करा – ९८६९६७४८२०*